**मागणी क्रमांक आर-१, लेखाशिर्ष "२२१०३०६५" अंतर्गत अनुशेषांर्गत प्राथमिक आरोग्य केंद्र व उपकेंद्रें बांधकामासाठी सन २०२१-२२ या आर्थिक वर्षासाठी निधी मंजुर करण्याबाबत.**

## महाराष्ट्र शासन
## सार्वजनिक आरोग्य विभाग
### शासन निर्णय, क्रमांकः संकीर्ण २०२१/प्र.क्र.२०४/आरोग्य ३

१० वा मजला, संकुल इमारत,
जी.टी. रुग्णालय आवार, मुंबई - ४०० ००१.
दिनांक : ६ डिसेंबर, २०२१.

**वाचा :**

१) **वित्त विभाग शासन परिपत्रक क्र.अर्थसं-२०२१/प्र.क्र.४८/अर्थ-३ दि.०६.०४.२०२१**

२) **वित्त विभाग शासन निर्णय क्र.अर्थसं-२०२१/प्र.क्र.४८/अर्थ-३ दि.२४.०६.२०२१**

३) **सहसंचालक आरोग्य सेवा, रुग्णालय राज्यस्तर,मुंबई यांचे पत्र क्र.आआसे/ कक्ष-७अ /टे-२/नस्ती क्र.४ /प्रादेशिक अनुशेष/सन २०२१-२२ /निधी वितरण/२०२१/२२०१-०२ दि.०७.०६.२०२१**

४) **सार्वजनिक आरोग्य विभाग शासन निर्णय समक्रमांक दि. १८ ऑगस्ट, २०२१.**

**प्रस्तावना :**

राज्यातील प्रादेशिक अनुशेष दूर करण्यासाठी सन २०२१-२२ या आर्थिक वर्षासाठी रु.५०००.०० लक्ष निधी मंजुर करण्यात आला आहे. त्यापैकी वित्त विभागाने रु.१५००.०० लक्ष निधी वितरणासाठी उपलब्ध करुन दिलेला आहे. त्यापैकी अनुक्रमांक ४ अन्वये रु.९१५.५४ लक्ष निधी वितरीत करण्यात आला असून उर्वरीत रु.५८४.०० लक्ष निधी वितरीत करण्याची बाब शासनाच्या विचाराधीन होती. त्याबाबत पुढील प्रमाणे निर्णय घेण्यात आला आहे.

### शासन निर्णय :

उपरोक्त संदर्भाधीन अनुक्रमांक-१ येथील शासन परिपत्रकान्वये "महाराष्ट्र विनियोजन विधेयक, २०२१" (महाराष्ट्र विनियोजन (लेखानुदान) अधिनियम, २०२१ यांच्या अनुसूचीच्या स्तंभ ४ मध्ये विनिर्दिष्ट करण्यात आलेल्या रकमांसह) यास महाराष्ट्र विधानमंडळाने मंजूरी दिली असून, महाराष्ट्राचे राज्यपाल यांनी त्यास अधिसंमती दिलेली आहे आणि ते २०२१ चा महाराष्ट्र अधिनियम क्रमांक ०५ म्हणून महाराष्ट्र राजपत्र असाधारण भाग-४, दि.१५ मार्च,२०२१ अन्वये प्रसिध्द करण्यात

आला आहे. त्यास अनुसरुन सन २०२१-२२ च्या आर्थिक वर्षामध्ये मंजुर करण्यात आलेल्या रु.५०००.०० लक्ष पैकी रु.५८४.०० लक्ष (अक्षरी रुपये पाच कोटी चौऱ्यांशी लक्ष फक्त) निधी प्राथमिक आरोग्य केंद्र, उपकेंद्र मुख्य इमारत व निवासस्थान बांधकामासाठी सोबत जोडण्यात आलेल्या प्रपत्र "अ"नुसार खालील अटीच्या अधिन राहून निधी वितरीत करण्यात येत आहे.

**अटी व शर्ती :-**

१) कामासाठी निविदा मागविण्याआधी सदर कामास संबंधित विभागातील सक्षम अधिकाऱ्यांची तांत्रिक मंजुरी घेणे आवश्यक राहील.

२) कामाची निविदा काढतांना प्रत्येक कामाची स्वतंत्रपणे निविदा काढण्यात यावी.

३) कामासाठीच्या जागेची उपलब्धता, योग्यता व जागा पुरेशी आहे किंवा नाही याबाबतची खात्री संबंधित आरोग्य संस्था प्रमुखांनी करावी.

४) कार्यकारी अभियंता, जिल्हा परिषद यांनी प्रत्यक्ष आरोग्य संस्थांची पाहणी करुन त्यानुसार सविस्तर अंदाजपत्रक व आराखडे तयार करुन काम करण्यात यावे.

५) प्रत्यक्ष काम करतेवेळी पर्यावरण विभाग, शासन निर्णय क्र.इएनव्ही-२०१३/प्र.क्र.१७७/तां.क.१ दि. १० जानेवारी,२०१४ मध्ये उल्लेख करण्यात आलेल्या मार्गदर्शक तत्वांनुसार कार्यवाही करण्यात यावी.

६) उपरोक्त कामे सदर रक्कमेत पूर्ण होतील यांची दक्षता घ्यावी.

३. सदर प्रस्तावावरील खर्च मागणी क्रमांक- आर-१, मुख्यलेखाशिर्ष "२२१०- वैद्यकीय सेवा व सार्वजनिक आरोग्य, ०६- सार्वजनिक आरोग्य, ८००- इतर खर्च, प्रादेशिक असमतोल दूर करण्याकरीता योजना- स्थानिक क्षेत्रातील योजना (राज्य योजना), (०१)(०७) महाराष्ट्र जिल्हा परिषद व पंचायत समिती अधिनियम, १९६१ याच्या कलम १८७ अन्वये योजनांतर्गत योजनांकरिता अनुदान (२२१० ३०६५), ३१ सहायक अनुदान (वेतनेतर)" याखाली सन २०२१-२२ करीत उपलब्ध असलेल्या निधीमधून खर्ची टाकण्यात यावे.

४. सार्वजनिक आरोग्य विभागाच्या अखत्यारितील सर्व नियंत्रक अधिकाऱ्यांना असे कळविण्यात येते की, सोबत जोडलेल्या विवरणपत्र "अ" मध्ये नमूद केल्याप्रमाणे रुपये रु.५८४.०० लक्ष (अक्षरी रुपये पाच कोटी चौऱ्यांशी लक्ष फक्त) इतक्या निधीचे कामनिहाय वाटप करण्यात यावे व अर्थसंकल्प वितरण प्रणालीवर वितरीत करण्यात आलेला निधी उपलब्ध करुन दिल्यानुसारच खर्च करण्यात यावा. या व्यातिरिक्त दुसऱ्या कामावर सदर निधी खर्च करावयाचा झाल्यास त्यास शासनाची परवानगी घेण्यात यावी. तसेच मंजुर करण्यात आलेल्या निधी पेक्षा अधिक निधी खर्च होणार नाही याची दक्षता घेण्यात यावी.

सदर शासन निर्णय महाराष्ट्र शासनाच्या www.maharashtra.gov.in या संकेतस्थळावर उपलब्ध करण्यात आला असून त्याचा संकेताक २०२१११२९१७३८४३६९१७ असा आहे. हा आदेश डिजीटल स्वाक्षरीने साक्षांकित करुन काढण्यात येत आहे.

महाराष्ट्राचे राज्यपाल यांच्या आदेशानुसार व नावाने.

Roshani Dinesh Kadam Patil

Digitally signed by Roshani Dinesh Kadam Patil
DN: CN = Roshani Dinesh Kadam Patil, C = IN, S = Maharashtra, O = Government Of Maharashtra, OU = Public Health Department
Date: 2021.12.06 15:37:04 +05'30'

**( रो.दि.कदम पाटील )**
अवर सचिव, महाराष्ट्र शासन.

प्रत,

१. महालेखापाल, महाराष्ट्र १/ २ (लेखा व अनुज्ञेयता/ लेखापरीक्षा), मुंबई/ नागपूर.
२. संचालक, आरोग्य सेवा, मुंबई.
३. सह संचालक, रुग्णालये (जिल्हास्तर), आरोग्य सेवा, मुंबई.
४. सर्व उप संचालक, आरोग्य सेवा मंडळे.
५. जिल्हा कोषागार अधिकारी. (जळगाव/सातारा/कोल्हापूर/परभणी)
६. जिल्हा आरोग्य अधिकारी (जळगाव/सातारा/कोल्हापूर/परभणी)
७. नियंत्रक, लेखा व लेखापरीक्षा, आरोग्य सेवा संचालनालय, पुणे.
८. वित्त विभाग (अर्थसं ३), मंत्रालय, मुंबई.
९. सार्वजनिक आरोग्य विभाग (कार्यासन- अर्थसंकल्प/ आरोग्य ३-अ, आरोग्य ४), मंत्रालय, मुंबई.
१०.निवडनस्ती (आरोग्य ३).

| प्रपत्र "अ" | | | |
|---|---|---|---|
| | | | (रूपये लाखात) |
| **अ.क्र** | **जिल्हा** | **संस्थेचे नाव** | **वितरीत निधी** |
| १ | जळगांव | प्रा.आ.केंद्र शिंदाड | ५०.०० |
| | | **एकूण** | **५०.००** |
| २ | सातारा | प्रा.आ.केंद्र मस्करवाडी | १२५.०० |
| ३ | सातारा | प्रा.आ.केंद्र वेणेगांव | ५०.०० |
| ४ | सातारा | प्रा.आ.केंद्र लोहम | ५०.०० |
| | | **एकूण** | **२२५.००** |
| ५ | कोल्हापूर | प्रा.आ.केंद्र तुर्केवाडी | १५०.०० |
| ६ | कोल्हापूर | प्रा.आ.केंद्र भडगांव | ५०.०० |
| ७ | कोल्हापूर | प्रा.आ.केंद्र आरळे | ५०.०० |
| ८ | कोल्हापूर | प्रा.आ.केंद्र तुर्केवाडी (निवासस्थान) | ९.०० |
| | | **एकूण** | **२५९.००** |
| ९ | परभणी | प्रा.आ.केंद्र भोगांव | ५०.०० |
| | | **एकूण** | **५०.००** |
| **सर्व जिल्हा एकूण अनुदान** | | | **५८४.००** |